**स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेतून एक विशेष बाब म्हणून माहे मार्च २०२३ मध्ये रु. १० कोटी मर्यादेपेक्षा जास्त रक्कम खर्च करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: मुद्रांक- २०१७/३२६६/प्र.क्र.५०४ /म-१ (धोरण)**

दालन क्र. एम-७ ए. पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ३१ मार्च, २०२३.

वाचा : १) शासन ज्ञापन क्रमांक: आस्थापना - २००१/प्र.क्र. ४१०/म-१, दि.३१.१०.२००१

२) शासन निर्णय क्रमांक: नोंदणी (संगणक)-२०१५/१५१७/प्र.क्र.४५२/म-१, दि.०८ ऑक्टोबर, २०१५.

३) शासन शुद्धिपत्रक क्रमांक: मुद्रांक-२०१७/३२६६/प्र.क्र.५०४ /म-१, दि. १९ जून, २०१८

४) शासन शुध्दीपत्रक क्रमांक: मुद्रांक-२०१७/३२६६/प्र.क्र.५०४ /म-१(धोरण), दि. ११.१.२०२१

५) शासन निर्णय क्रमांक: मुद्रांक- २०१७/३२६६/प्र.क्र.५०४ /म-१ (धोरण), दि. ३१.०३.२०२२

६) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक यांचे अ.शा.पत्र क्र. का-७ / PLA/३२४ दि. २१.०३.२०२३.

७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६ मार्च २०२३.

**प्रस्तावना:-**

महसूल व वन विभाग, शासन ज्ञापन दिनांक ३१.१०.२००१ अन्वये नोंदणी व मुद्रांक विभागाचे बांधा, वापरा, हस्तांतरण करा या तत्त्वावर संगणकीकरण करण्यासाठी "स्वीय प्रपजी लेखे" उघडण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ४ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयात निर्धारित केलेल्या "स्वीय प्रपंजी लेख्यात" जमा होणाऱ्या रकमेतून शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय दरमहा खर्च करण्याची मर्यादा रु. १० कोटी इतक्या रकमेच्या मर्यादपर्यंत वाढविण्यात आली आहे.

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेमधून दि.११/०१/२०२१ च्या शासन निर्णयानुसार नोंदणी व मुद्रांक विभागाचे संगणकीकरण, महा आयटी, एनआयसी यांचेकडून मोठ्या प्रमाणावर तांत्रिक मनुष्यबळाची नियुक्ती करण्यात आलेली असल्याने त्यांचे मानधन, बीएसएनएलची देयके, ई ऑफिस यंत्रणा सुरु करणे, इ. बाबींसाठी माहे मार्च, २०२३ मध्ये रुपये दहा कोटी पेक्षा जास्त खर्च होणार आहे.

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेमधून रु. १० कोटी मर्यादेपेक्षा जास्त खर्च करण्यास एक विशेष बाब म्हणून परवानगी मिळण्याबाबत संदर्भ क्र.६ अन्वये विनंती केली होती. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेमधून माहे मार्च, २०२३ मध्ये रु. १० कोटी मर्यादेपेक्षा जास्त खर्च करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेमधून दि.११/०१/२०२१ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार नोंदणी व मुद्रांक विभागाचे संगणकीकरण, महा आयटी, एनआयसी यांचेकडून मोठ्या प्रमाणावर तांत्रिक मनुष्यबळाची नियुक्ती करण्यात आलेली असल्याने त्यांचे मानधन, बीएसएनएलची देयके, ई ऑफिस यंत्रणा सुरु करणे, इ. विविध बाबींसाठी माहे मार्च, २०२३ मध्ये रु. १० कोटीच्या मर्यादेपेक्षा जास्त म्हणजेच एकूण रु. १७,६०,००,०००/- (अक्षरी रु. सतरा कोटी साठ लाख फक्त) इतका खर्च करण्यास " एक विशेष बाब " म्हणून या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च हा ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौ.संदर्भ क्र. ८५/२०२३/कोप्र-०५, दिनांक २९.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०४०३१४१३४९८३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2023.04.03 14:19:22 +05'30'

**(सुनिल जाधव)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रतः**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सभापती व उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. अध्यक्ष व उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई.
१२. महालेखापाल- १ व २ (मुंबई/नागपूर) महाराष्ट्र राज्य.
१३. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१४. कार्यासन म-१(धोरण) महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.